महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळामार्फत शैक्षणिक कर्ज व्याज परतावा योजना राबविण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## इतर मागास बहुजन कल्याण विभाग,

**शासन निर्णय क्रमांक : इमाव २०२१/प्र.क्र.२३/महामंडळे**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**

**दिनांक :- ६ डिसेंबर, २०२१**

संदर्भ : व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ पत्र क्र. इमाविवि / कक्ष-५/नवीन शै.क.यो./६५१, दि.२७.०१.२०२१.

प्रस्तावना :-

इतर मागासवर्ग प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक हिताच्या दृष्टीकोनातून त्यांना उच्च शिक्षणासाठी प्रोत्साहित करणे, त्यांना शैक्षणिक व आर्थिकदृष्ट्या सक्षम करणे तसेच विद्यार्थ्यांना शिक्षणासाठी कर्जावरील व्याज उलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने शैक्षणिक कर्ज व्याज परतावा योजना राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळामार्फत इतर मागासवर्ग प्रवर्गातील विद्यार्थी / विद्यार्थिनींना शैक्षणिक कर्ज व्याज परतावा योजना राबविण्याची अंमलबजावणी करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजनेचे स्वरुप आणि कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहील :-

**योजनेचा उद्देश** :-

१. राज्य, देशांतर्गत व आंतरराष्ट्रीय अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेले इतर मागासवर्ग प्रवर्गातील विद्यार्थी / विद्यार्थिनींना उच्च शिक्षणाकरीता बँकेमार्फत उपलब्ध शैक्षणिक कर्ज रक्कमेवरील व्याजाचा परतावा करणे.

२. विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक हिताच्या दृष्टीकोनातून त्यांना उच्च शिक्षणासाठी प्रोत्साहित करणे.

३. शैक्षणिक व आर्थिकदृष्टया सक्षम करणे.

४. विद्यार्थ्यांना शिक्षणासाठी कर्जावरील व्याज उपलब्ध करुन देणे.

**उद्दीष्टे** :-

सर्व जिल्हा कार्यालयांना मागणीच्या प्रमाणात व आवश्यकतेनुसार कमी अधिक आर्थिक व भौतिक उद्दीष्ट निर्धारित करण्यात येतील.

**योजनेचे स्वरुप** :- इतर मागासवर्ग प्रवर्गातील विद्यार्थी / विद्यार्थिंनीना उच्च शिक्षणासाठी बँकेकडुन खालीलप्रमाणे कर्ज मर्यादेत वितरीत केलेल्या रक्कमेवर कमाल १२% व्याज दरापर्यंत व्याज परतावा अदा करण्यात येईल.

१. राज्यांतर्गत अभ्यासक्रमासाठी महत्तम कर्ज मर्यादा रु.१०.०० लक्ष
२. देशांतर्गत अभ्यासक्रमासाठी महत्तम कर्ज मर्यादा रु.१०.०० लक्ष
३. परदेशी अभ्यासक्रमासाठी महत्तम कर्ज मर्यादा रु.२०.०० लक्ष

**लाभार्थीच्या पात्रतेच्या अटी व शर्ती** :-

१. अर्जदाराचे वय १७ ते ३० वर्षे असावे.
२. अर्जदार महाराष्ट्राचा रहिवाशी व इतर मागास प्रवर्गातील असावा.
३. अर्जदाराची कौटुंबिक वार्षिक उत्पन्न मर्यादा ग्रामिण व शहरी भागाकरीता रु.८.०० लक्ष पर्यंत व शासनाच्या सक्षम प्राधिकरणाने वेळोवेळी निर्धारित केलेल्या नॉन क्रिमिलेअर च्या मर्यादेत.
४. अर्जदार इयत्ता १२ वी ६०% गुणांसह उत्तीर्ण असावा.
५. पदवीच्या द्वितीय वर्ष व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेणारे विद्यार्थी ६०% गुणांसह पदवीका (Diploma) उत्तीर्ण असावा.
६. पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी किमान ६०% गुणांसह पदवी उत्तीर्ण असावा.
७. केवळ पदवी व पदव्युत्तर शैक्षणिक अभ्यासक्रमाकरीता शासन मान्यता प्राप्त संस्थेमध्ये प्रवेश घेतलेले विद्यार्थी.
८. अर्जदार कोणत्याही वित्तीय संस्थेचा, बँकेचा थकबाकीदार नसावा / अर्जदाराचे वय १८ पेक्षा कमी असल्यास अर्जदाराचे पालक यांचे थकबाकीदार नसावेत.
९. बँकेने मंजुर व वितरीत केलेल्या रक्कमेवरील व्याजाची नियमित परतफेड करणारे अर्जदार व्याज परतावा योजनेसाठी पात्र राहील.
१०. राज्य व देशांतर्गत अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्याकरीता बँकेने उपलब्ध करुन दिलेल्या कर्जामध्ये शैक्षणिक शुल्क, पुस्तके, साहित्य खरेदी व अर्जदाराच्या राहण्याचा व भोजनाचा खर्च समावेश राहील.
११. परदेशी अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्याकरीता बँकेने उपलब्ध करुन दिलेल्या कर्जामध्ये फक्त शैक्षणिक शुल्क, पुस्तके, साहित्य खरेदीचा समावेश राहील.
१२. अर्जदाराचा सिबील क्रेडिट स्कोअर ०, -१ (म्हणजेच यापुर्वी त्याने कर्ज घेतलेले नसावे) किंवा ५०० पेक्षा जास्त असावा.

**व्याजाचा परतावा :-**

महामंडळ केवळ बँकेकडुन वितरीत केलेल्या उपरोक्त नमुद शैक्षणिक कर्जाच्या मर्यादेत रक्कमेवरील जास्तीत जास्त १२% पर्यंत व्याजदराने नियमित परतफेड करणाऱ्या लाभार्थीना व्याजाचा परतावा लाभार्थीच्या आधार संलग्न बँक खात्यामध्ये अदा करेल.

**कर्ज प्रस्तावा सोबत अपलोड करावयाची कागदपत्रे :-**

१. अर्जदाराचा इतर मागास प्रवर्गातील जातीचा दाखला
२. उत्पन्नाचा दाखला
३. महाराष्ट्राचा रहिवाशी दाखला.(Domicile)
४. अर्जदार व अर्जदाराचे पालक यांचे आधार कार्ड (Front & Backside).
५. ज्या अभ्यासक्रमाकरीता शैक्षणिक कर्ज आवश्यक आहे त्या अभ्यासक्रमासाठीची पात्रता परीक्षा उत्तीर्ण झाल्याची गुणपत्रिका.
६. अर्जदार व अर्जदाराचे पालक यांचे पासपोर्ट आकारातील फोटो.
७. अर्जदाराचा जन्माचा / वयाचा दाखला.
८. शैक्षणिक शुल्क संबंधित पत्र
९. शिष्यवृत्ती (Scholarship), शैक्षणिक शुल्कमाफी (Free ship) पात्रतेबाबतचे प्रमाणपत्र.
१०. मान्यताप्राप्त संस्थेत प्रवेश घेतल्याचा पुरावा.
११. आधार संलग्न बँक खाते पुरावा.
१२. इतर आवश्यक पुरावे.

**अभ्यासक्रम :-**

**अ. राज्यांतर्गत अभ्यासक्रम** :- केंद्रीय परिषद, कृषी विद्यापीठ परिषद, शासकीय अनुदानित व खाजगी मान्यताप्राप्त (NAAC मानांकन प्राप्त) शैक्षणिक संस्थेत अभ्यासक्रमासाठी शासनमान्य सामाईक पात्रता परीक्षा उत्तीर्ण झालेल्या व त्यानुसार प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांसाठी -

१. **आरोग्य विज्ञान** - MBBS, BDS, BAMS, BHMS, B.Pharm व संबंधीत विषयांतील सर्व पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रम
२. **अभियांत्रिकी** - B.E. (सर्व शाखा), B.Tech. (सर्व शाखा), B.Arch. व संबंधीत विषयांतील सर्व पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रम
३. **व्यावसायिक व व्यवस्थापन** - LLB, फॅशन टेक्नोलॉजी, इंटेरिअर डिझाईन मधील पदवी, हॉटेल मॅनेजमेंट अँड केटरिंग पदवी, बॅचलर ऑफ डिझाईन, फिल्म व टेलिव्हिजन शैक्षणिक संस्थेचे पदव्युत्तर अभ्यासक्रम, सनदी लेखापाल / कंपनी सचिव, पायलट, Shipping, MBA, MCA, व संबंधीत विषयांतील सर्व पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रम

४. **कृषी, अन्नप्रक्रिया व पशुविज्ञान** - Animal & Fishery Sciences, B.Tech., BVSC (Bachelor of Veterinary Science), B.Sc. (कृषी व दुग्ध विज्ञान) व संबंधीत विषयांतील सर्व पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रम

**ब. देशांतर्गत अभ्यासक्रम** :- केंद्रीय परिषद, कृषी विद्यापीठ परिषद, शासकीय अनुदानित व खाजगी मान्यताप्राप्त (NAAC मानांकन प्राप्त) शैक्षणिक संस्थेत अभ्यासक्रमासाठी शासनमान्य सामाईक पात्रता परीक्षा उत्तीर्ण झालेल्या व त्यानुसार प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांसाठी तसेच खालील नमूद केलेल्या नामांकित संस्थेत प्रवेश घेतलेले विद्यार्थी पात्र असतील.

१. **आरोग्य विज्ञान** - *All India Institute of Medical Sciences (AIIMS) & Medical Council of India (MCI),* इ. संस्थेची मान्यता असलेले सर्व पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रम.

२. **अभियांत्रिकी** - Indian Institute of Technology (IIT), Indian Institutes of Information Technology (IIITs), National Institutes of Technology (NITs), Schools of Planning and Architecture (SPAs), Institute of National Importance (INI), इ. संस्थेची मान्यता असलेले सर्व पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रम

३. **व्यावसायिक व व्यवस्थापन** - Indian Institutes of Management (IIMs), Bar Council, National Institute of Fashion Technology (NIFT), Institute of Hotel Management, National Institute of Design, Film and Television Institute of India, Charterd accountants, The Institute of Cost Accountants of India, The Institutes of Company Secretaries of India, Director General of Civil Aviation, Govt. of India's, International Maritime Academy, इ. संस्थेची मान्यता असलेले सर्व पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रम

४. **कृषी, अन्नप्रक्रिया व पशुविज्ञान** - Indian Council of Agricultural Research, Agricultural Sciences , Biological and Medical Sciences, Chemical Sciences, Physical Sciences and Mathematics, Earth Sciences, Minerals and Metallurgy, Iindian Veternary Research Institute (IVRI), इ. संस्थेची मान्यता असलेले सर्व पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रम

**क. परदेशी अभ्यासक्रम** (Foreign Education):-

१. **आरोग्य विज्ञान** - Doctor of Medicine (MD), Master of Science (MS),

२. **अभियांत्रिकी** - Civil, Mechanical, Electrical, Chemical, Computer, Production, Industrial, Enviormental, Marine, Petrochemical, Elctronics & Tele Communication, IT, IIS, Biotechnology, Generic Engineering. Architecture.

३. **व्यावसायिक व व्यवस्थापन** - MBA, Hotel Management, LLB, LLM

४. **विज्ञान** - Agriculture, Hourticulture, Animal Husbandery, General Science, Maths, Science, Phyisics, Chemistry, Botony, Zoology

५. **कला** (Art) - Fine Art, Film Making, Animation, Design, Fashion,

**ड.** शैक्षणिक अभ्यासक्रमामध्ये सक्षम प्राधिकरणाने / शासनाने बदल किंवा नवीन अभ्यासक्रम समाविष्ट केल्यास त्यानुषंगाने बदल करण्याचे अधिकार महामंडळाच्या संचालक मंडळास असतील.

**इतर अटी व शर्ती** - परदेशी अभ्यासक्रमांतर्गत शैक्षणिक कर्ज घेतलेल्या लाभार्थींनी व्याज परतावा मागणी करताना खालील नमुद बाबी संबधित आवश्यक कागदपत्रे सादर करणे अनिवार्य राहील.

१. परदेशी अभ्यासक्रमासाठी QS (Quacquarelli Symonds) च्या रँकिंग / गुणवत्ता निकषांनुसार संस्थेचे स्थान २०० पेक्षा आतील परदेशातील शैक्षणिक संस्थेत प्रवेश घेतलेले विद्यार्थी.

२. परदेशी अभ्यासक्रमाकरीता पात्रता परीक्षा Graduate Record Exam (GRE), Test of English as a Foreign Language (TOEFL) उत्तीर्ण झालेले विद्यार्थी.

**कार्यपध्दती** :-

१. सदर योजना संपुर्णपणे ऑनलाईन पध्दतीने राबविण्यात येईल.

२. इच्छूक अर्जदाराने महामंडळाच्या वेबपोर्टलवर ऑनलाईन अर्ज सादर करणे बंधनकारक राहील.

३. प्राप्त प्रस्तावास जिल्हा लाभार्थी निवड समितीची मान्यता घेवून जिल्हा व्यवस्थापक सदर प्रस्ताव मुख्यालयास मंजुरीकरीता सादर करतील.

४. अर्ज मुख्यालय स्तरावर तपासणी करून ऑनलाईन पात्रता प्रमाणपत्र (LoI) निर्गमित करेल. सदरचे पात्रता प्रमाणपत्र फक्त ६ महिने कालावधीकरिता वैध राहील.

५. महामंडळाने निर्गमित केलेले पात्रता प्रमाणपत्र व ऑनलाईन केलेल्या अर्जाची प्रत अर्जदारास स्वत: बँकेकडे सादर करावे लागेल.

६. बँकेचे कर्ज मंजुरी पत्र, कर्ज वितरण प्रमाणपत्र ऑनलाईन पद्धतीने अपलोड करावे लागेल

७. शैक्षणिक कर्जाची दरमहा नियमित परतफेड आवश्यक आहे.

८. व्याज परतावा मागणीसाठी अर्जदाराने दरमहा बँक कर्ज खाते उतारा संगणक प्रणालीवर / वेबपोर्टलवर अपलोड करणे आवश्यक राहील.

९. अर्जदाराने मागणी केलेल्या व नियमित परतफेड केलेल्या परंतु पुढील परतफेडीच्या दिनांकापूर्वी परतफेड केल्यास व्याजाचा परतावा आधार सलग्न बँक खात्यात केला जाईल.

१०. अर्जदाराने थकीत रक्कमेचा भरणा केल्यास अर्जदारास लगतच्या परतफेड केलेल्या व्याजाच्या हप्त्याचा परतावा देय राहील.

**व्याज परतावा व परतफेडीचा कालावधी :-**

१. शैक्षणिक अभ्यासक्रम पुर्ण होईपर्यंत बँकेने अर्जदारास वितरीत केलेल्या कर्ज रक्कमेवरील व्याजाची नियमित परतफेड केलेल्या अर्जदारास केवळ व्याजाचा परतावा (कमाल १२% पर्यंत) महामंडळ अर्जदाराच्या आधार संलग्न बँक खात्यामध्ये वर्ग करेल.

२. व्याज परतावासाठी जास्तीत जास्त ५ वर्ष कालावधी ग्राह्य धरण्यात येईल.

**२.** सदर योजनेसाठी प्रतिवर्षी रु.६.०० कोटी (अक्षरी रुपये सहा कोटी फक्त) इतक्या रकमेच्या मर्यादेत खर्च करण्यास शासन याद्वारे परवानगी देत आहे.

**३.** या योजनेचा आढावा १ वर्षानंतर घ्यावा व सदरची योजना यापुढे सुरु ठेवावी किंवा बंद करावी याबाबतचा निर्णय घेण्यात यावा. तसेच प्रत्येक १ वर्षानंतर योजनेबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

**४.** सदर योजना महामंडळास उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीच्या मर्यादेत राबविण्यात यावी.

**५.** उक्त योजनेवरील खर्च हा मागणी क्र.झेडजी-०३, २२२५, अनुसुचित जाती, अनुसुचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीयांचे कल्याण, १०२, आर्थिक विकास, (०१)(०५) महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त आणि विकास महामंडळ या महामंडळास सहाय्यक अनुदान प्रधान लेखाशिर्ष २२२५ एफ २५४ या लेखाशीर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या आर्थिक तरतुदीमधुन भागविण्यात यावा.

**६.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२०७१७१०१५३६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

JAGTAP AJIT RAMESH

Digitally signed by JAGTAP AJIT RAMESH
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=OTHER BACKWARD BAHUJAN KALYAN DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1c57e2746855b8b01d38f9cbd79dc87f2af58135cf485d243d93ebf54c900920, serialNumber=62896254f9fecc7da7b3ba8fdc28bab4a5c1238d1090c223fd8574f24ba7ca52, cn=JAGTAP AJIT RAMESH
Date: 2021.12.07 17:16:09 +05'30'

**( अजित जगताप )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव

२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव

३. मा.विरोधी पक्ष नेता (विधानसभा / विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

४. मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

५. अध्यक्ष / उपाध्यक्ष / व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ, मुंबई

६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

७. मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव

८. आयुक्त समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे

९. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे

१०. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, कोकण भवन, नवी मुंबई (दोन प्रती)

११. महालेखापाल (ले.व अ.) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर

१२. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर

१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी मुंबई / ठाणे

१४. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई

१५. वित्त विभाग (का-व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ) मंत्रालय, मुंबई

१६. नियोजन विभाग (का.१४१३), मंत्रालय, मुंबई

१७. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई

१८. सर्व व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय आणि विकास महामंडळ (मर्या.)

१९. प्रधान सचिव (इ.मा.ब.क.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

२०. सह सचिव (इ.मा.ब.क.), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय,मुंबई

२१. निवडनस्ती (महामंडळे) विजाभज, इमाव व विमाप्र विभाग, मंत्रालय, मुंबई